मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक
विकास महामंडळाला राष्ट्रीय
अल्पसंख्यांक विकास व वित्तीय
महामंडळाची वाहिनीकृत यंत्रणा
म्हणून मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग
**शासन निर्णय** क्रमांक इएसई-२०००/प्र.क्र.३६/रोस्वरो-१,
नवीन प्रशासकीय भवन, १४वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ५ मार्च, २००१

वाचा : रोजगार व स्वयंरोजगार विभाग शा. नि. क्रमांक इएसई-२००० /प्र.क्र.१५७/ रोस्वरो-१, दि.२०/११/२०००

**शासन निर्णय** :- राज्यातील अल्पसंख्यांक समाजातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांच्या उन्नत्तीसाठी मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाची स्थापना कंपनी कायदा १९५६ अंतर्गत दिनांक २८/९/२००० रोजी करण्यात आली आहे. महामंडळाचे अधिकृत भागभांडवल रू.५० कोटी आहे.

२. शासनाने मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाची स्थापना अल्पसंख्यांक समाजातील आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांच्या उन्नतीसाठी केलेली असल्याने दिनांक १ मार्च, २००१ पासून महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळा **ऐवजी** मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाला राष्ट्रीय अल्पसंख्यांक विकास व वित्तीय महामंडळाची महाराष्ट्र राज्यातील वाहिनीकृत यंत्रणा म्हणून कार्य करण्यासाठी शासन या निर्णयान्वये मान्यता देत आहे.

३. हे आदेश सचिव, समाज कल्याण यांच्या दिनांक १५ फेब्रूवारी, २००१ च्या टिप्पणीव्दारे तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांकःअसंक५८/शा.ह दिनांक २७ फेब्रूवारी, २००१ व्दारे प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( भू. प्र. पाण्डेय )
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव

मा. मंत्री, रोजगार व स्वयंरोजगार यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्यसचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
अप्पर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग
प्रधान सचिव, नियोजन, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त, मंत्रालय, मुंबई
सचिव, समाजकल्याण व सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
संचालक, महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१,(लेखा व अनुज्ञेयता)मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१,(लेखा परीक्षा) मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२,(लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा) नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
मंत्रालयीन विभागाचे अ.मु.सचिव/प्रधान सचिव/सचिव
आयुक्त , रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, महाराष्ट्र राज्य, कोकणभवन, नवी मुंबई
वित्त विभाग, (हमी)/अर्थसंकल्प-३/साऊ
नियोजन विभाग, कार्या.१४४३
समाजकल्याण व सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
निवड नस्ती, रोस्वरो-१